**पदनिर्मीती, पदभरती व पदांचे पुनरुज्जीवन याबाबतचे निर्बंध व आनुषंगिक आढावे आणि अतिरिक्त संवर्ग योजनांतर्गत कक्षाची स्थापना व त्याचे व्यवस्थापन....**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय, क्रमांक : असंक-१००१/प्र.क्र.२९ (भाग-३)/२००२/वित्तीय सुधारणा,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ९ जानेवारी, २००३

**वाचा :** १) शासन निर्णय, क्रमांक : असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०सप्टेंबर, २००१.
२) शासन निर्णय, क्रमांक : असंक-१००१/प्र.क्र.२९ (भाग-२)/२००२/वित्तीय सुधारणा, दि.२६ फेब्रुवारी, २००२.

**प्रस्तावना**

राज्य शासनाच्या महसूली जमेच्या तुलनेत आस्थापनेवरील खर्च वाढला असल्यामुळे राज्याच्या विकासाच्या / जनकल्याणाच्या योजना राबविण्यासाठी पुरेसा निधी उपलब्ध होऊ शकत नाही. याबाबत उपाय योजना म्हणून शासनाच्या कर्मचारी आणि अधिकाऱ्यांच्या मासिक वेतन भत्त्यावरील प्रशासकीय स्वरुपाचा खर्च कमी करण्याच्या उद्देशाने तसेच शासकीय विभागांकडील विविध स्वरुपाच्या योजना आणि कार्यक्रम यांचे पुनरिक्षण करुन त्या योजना आणि कार्यक्रमांसाठी मंजूर करण्यात आलेल्या कर्मचारी आणि अधिकाऱ्यांच्या पदांचा आढावा घेऊन अनावश्यक अथवा जादा ठरत असणाऱ्या कर्मचारी आणि अधिकाऱ्यांना अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यासंबंधी शासनाने निर्गमित केलेल्या उपरोक्त दि.१० सप्टेंबर, २००१ च्या शासन निर्णयाच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीमध्ये निदर्शनास आलेल्या प्रशासकीय आणि तांत्रिक स्वरुपाच्या अडचणी निवारण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तद्नुसार शासनाने सदर शासन निर्णयात खाली दर्शविल्याप्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय**

१. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या उपपरिच्छेद २.९ ऐवजी खालील सुधारित उपपरिच्छेद समाविष्ट करण्यात यावेत.

**सुधारित उपपरिच्छेद :-**

**२.९ (अ)** सर्वसाधारणपणे उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेशिवाय शासकीय विभाग अथवा कार्यालयातील विविध संवर्गातील कोणतेही पद नव्याने निर्माण करता येणार नाही अथवा भरता सुध्दा येणार नाही. तथापि, काही प्रकरणांमध्ये न्यायालयीन आदेशामुळे संबंधित शासकीय विभाग अथवा कार्यालयांना विवक्षीत

स्वरुपाची पदे नव्याने निर्माण करणे अथवा भरणे बंधनकारक ठरते. अशा प्रकरणांमध्ये न्यायालयाच्या आदेशानुसार नवीन पद/पदे निर्माण करणे अथवा रिक्त पदे भरणे आवश्यक ठरत असल्यास अशा सर्व प्रकरणी न्यायालयीन निर्णयानुसार अधिसंख्य पदे निर्माण करण्यासाठी अथवा विद्यमान रिक्त पदे भरण्यासाठी उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता आवश्यक राहणार नाही. तथापि, अशा सर्व प्रकरणांमध्ये जर न्यायालयीन आदेशामुळे निर्माण करावयाची अधिसंख्य पदे अथवा भरावयाची रिक्त पदे उप सचिव आणि त्यापेक्षा अधिक दर्जाची (वेतनश्रेणीची) पदे असतील तर मात्र अशा प्रस्तावासाठी प्रचलित नियमानुसार राज्य मंत्रिमंडळाची मान्यता प्राप्त करणे बंधनकारक राहिल.

२. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या उपपरिच्छेद ३.२ ऐवजी खालील सुधारित उपपरिच्छेद समाविष्ट करण्यात यावा.

**<u>सुधारित उपपरिच्छेद</u> :-**

"३.२ सर्वसाधारणपणे शासकीय विभाग अथवा कार्यालयामधील मंजूर पदांपैकी कोणतेही पद कोणत्याही कारणास्तव ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी भरण्यात आलेले नाही, म्हणजेच रिक्त राहिले तर असे पद आपोआपच व्यपगत ठरेल. तथापि, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग आणि विमुक्त जाती व भटक्या जमाती, महिला आणि शरिरिकदृष्टया अपंग व्यक्ती या सामाजिक घटकांना जे घटनादत्त, कायदेशीर अथवा प्रशासकीय आरक्षण आहे त्या आरक्षणानुसार तत्संबंधीची आरक्षित पदे कोणत्याही कारणास्तव ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त राहिली तरी व्यपगत होणार नाहीत. अशा प्रकारच्या आरक्षण पदांपैकी ९० टक्के पदे प्रधान सचिव (व्यय) व प्रधान सचिव (प्र.सू.र.व का.), सामान्य प्रशासन विभाग तसेच उच्चस्तरीय सचिव समितीच्या पूर्व मान्यतेशिवाय शासकीय विभाग आणि कार्यालये यांना भरता येतील. अशा प्रकारची सर्व आरक्षणाची रिक्त पदे भरताना संबंधित शासकीय विभाग अथवा कार्यालयाच्या नियुक्ती अधिकाऱ्याने स्वातंत्र सैनिकांचे वारस, सन १९९१ चे कार्यमुक्त जनगणना कर्मचारी, अंशकालीन कर्मचारी, सेवानिवृत्त चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे वारस, अनुकंपा तत्वावरील नियुक्ती करावयाचे उमेदवार, प्रकल्पग्रस्त उमेदवार या प्रवर्गांमधील घटनादत्त आरक्षण असलेल्या उमेदवारांचासुध्दा नियुक्तीसाठी विचार करावा.

वर नमूद केल्याप्रमाणे आरक्षण संवर्गातील रिक्त पदे भरताना संयुक्त समिती, उच्चस्तरीय सचिव समिती तसेच वित्त विभागाची पूर्व मान्यतासुध्दा आवश्यक असणार नाही. तथापि, संबंधित रिक्त पदे भरताना नियुक्त करावयाच्या कर्मचारी व अधिकाऱ्यांच्या मासिक वेतन व भत्ते प्रदानासाठी अर्थसंकल्पिय तरतूद करण्याची, वाढवुन घेण्याची गरज निर्माण होत असेल तर अशा सर्व प्रकरणी मात्र संबंधित शासकीय विभाग व कार्यालयांनी वित्त विभागाची पूर्व मान्यता घेणे बंधनकारक राहील."

३. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या परिशिष्ट तीन मधील परिच्छेद १४ ऐवजी खालील प्रमाणे सुधारित परिच्छेद समाविष्ट करण्यात यावा.

" १४. उच्चस्तरीय सचिव समितीने पद भरतीस मान्यता दिल्यानंतर प्रथम अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे समकक्ष उमेदवार उपलब्ध आहेत किंवा नाही याची खात्री करावी आणि जर अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे समकक्ष अतिरिक्त कर्मचारी उपलब्ध नसतील तर त्याप्रमाणे त्या कक्षाकडून **"ना-हरकत प्रमाणपत्र"** प्राप्त करुन पदोन्नती/ सरळसेवेने उमेदवार भरण्यासाठी पुन्हा उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याची आवश्यकता असणार नाही."

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**विनोद कुळकर्णी**
**शासनाचे उप सचिव**

प्रति

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर

* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

५. राज्यपालांचे सचिव

६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

७. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक

९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव

१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१

११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

१४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई

* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई

* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई

GR2003 REV
एच-1006(9000+45-1-03)2

* १७. प्रबंधक महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई.

* १८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.

* १९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई

* २०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई.

* २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर / मुंबई, वांद्रे, मुंबई - ४०० ०५१

२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती

२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई / पुणे/ नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती

२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

२५. सर्व उप कोषागार अधिकारी

२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख

२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग (कार्यासन - हाऊसिंग सेल, १९-सी), मंत्रालय, मुंबई - ३२.

२८. सर्व विभागीय आयुक्त.

२९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३०. सर्व जिल्हाधिकारी

३१. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

३२. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी

३३. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१

३४. संचालक, (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१.

३५. वित्त विभागातील सर्व कार्यासने

३६. निवड नस्ती, वित्तीय सुधारणा, वित्त विभाग.

* पत्राद्वारे.

---